**अर्थसंकल्प नियमावलीतील पुनर्विनियोजनाचे अधिकार दिनांक ३१ मार्च, २०१७ पर्यंत वित्त/नियोजन विभागाचे सहमतीने वापरणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीजीएम-२०१६/प्र.क्र.१२ /अर्थसंकल्प-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०१७.

**प रि प त्र क**

अर्थसंकल्पिय तरतुदीत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषीय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पिय व्यवस्थापन अधिनियमांतर्गत निर्धारित केलेली वार्षिक लक्ष्ये साध्य करण्याचे संदर्भात उद्दिष्ट पूर्तीसाठी उपयुक्त ठरणार असल्याने आवश्यकतेनुसार योजनांतर्गत पुनर्विनियोजन नियोजन व वित्त विभागाचे मान्यतेने व योजनेतर तरतुदींचे पुनर्विनियोजन वित्त विभागाचे सहमतीने दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत करण्यात यावे. विभागांकडून निर्गमित करण्यात येणा-या पुनर्विनियोजनाच्या आदेशात यथास्थिती नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीदर्शक अनौपचारिक संदर्भाचा उल्लेख करण्यात यावा, असे या परिपत्रकाव्दारे निर्देश देण्यात येत आहेत.

२. तथापि, वित्त विभाग, शासन निर्णय,क्रमांक विअप्र १०९६/ प्र.क्र.२२/९६/ विनियम, दि.२१ ऑगस्ट,१९९६ च्या शासन निर्णयातील परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अनुक्रमांक ९ नुसार अर्थसंकल्प तरतुदीत विनियोजन व पुनर्विनियोजन करण्यास मा.मुख्य न्यायाधिश,उच्च न्यायालय यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले असल्याने, त्यांना वगळण्यात येत आहे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०३०७१६२७३०५५०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.03.07 16:29:46 +05'30'

(व.कृ.पाटील)
सह सचिव, वित्त विभाग.

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,सर्व मंत्रालयीन विभाग , मंत्रालय, मुंबई.
२. सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा),महाराष्ट्र,मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा),महाराष्ट्र,नागपूर .
६. महालेखापाल (लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,मुंबई .
७. महालेखापाल (लेखापरीक्षा ),महाराष्ट्र,नागपूर .

८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
९. निवासी लेखा अधिकारी,मुंबई
१०. कार्यासन अधिकारी,प्रशासन-४,वित्त आयोग,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११. अर्थसंकल्प शाखेतील सर्व कार्यासन,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.